**सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात सात महानगरांच्या निकटच्या शहरांच्या नागरी पायाभूत सुविधांचा विकास (UIDSST) या केंद्र शासन पुरस्कृत योजनेअंतर्गत वसई-विरार शहर महानगरपालिकेस भुयारी गटार प्रकल्पासाठी केंद्र हिश्याच्या दुसऱ्या हप्त्याचे अनुदान वितरण.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः युआयडी-२०१४/प्र.क्र.१७१(१)/नवि-३३**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

तारीख: २१ फेब्रुवारी, २०१५.

वाचा —

**केंद्रीय नगर विकास मंत्रालयाचे आदेश क्रमांक K-१४०११/१८/२०११-UD-III, दिनांक २२ मे, २०१४.**

प्रस्तावना —

नागरीकरणाचा वाढता वेग व व्याप्ती विचारात घेऊन केंद्र शासनाने देशातील ज्या शहरांची लोकसंख्या १० लाखापेक्षा अधिक आहे. अशा निवडक शहरांच्या जवळ असलेल्या व वाढत्या प्रमाणात ज्या शहरांचा विस्तार होत आहे अशा शहरांची निवड करून त्या शहरात पायाभूत सोयी सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी "सात शहरांच्या निकटच्या शहरांच्या नागरी पायाभूत सुविधांचा विकास" (UIDSST) हा महत्वाकांक्षी कार्यक्रम राबविला जात आहे. सदरहू अभियानाअंतर्गत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार केंद्र व राज्य शासनामार्फत अनुदान मंजूर केले जाते. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने केंद्र व राज्य शासनामार्फत वितरीत निधीच्या प्रमाणात त्यांचा स्वहिस्सा भरणे अनिवार्य आहे.

०२. उक्त कार्यक्रमाअंतर्गत वसई-विरार शहर महानगरपालिकेच्या रूपये ६६.२२६३ कोटी किंमतीच्या भुयारी गटार योजनेच्या प्रकल्पास केंद्र शासनाने यापूर्वीच मंजूरी दिलेली असून संदर्भाधीन आदेशान्वये सदरहू प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या हिश्याच्या दुसरा हप्ता वितरीत करण्यास केंद्र शासनाने मान्यता दिली आहे. केंद्र शसनाच्या उक्त मंजूरीनुसार व सदर अभियानाच्या मार्गदर्शक तत्वानुसार केंद्र शासनामार्फत वितरीत करावयाच्या निधीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रूपये कोटीत)

| अनु क्र. | महानगरपालिकेचे नाव | योजनेचे स्वरूप | मंजूर किंमत | केंद्र शासनाचा हिस्सा ८० टक्के | राज्य शासनाचा हिस्सा (१० टक्के) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा (१० टक्के) | सध्या वितरीत करावयाचा केंद्र शासनाचा हिस्सा | केंद्र शासनाने सध्या वितरीत केलेल्या निधीच्या हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २. | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | वसई-विरार | भुयारी गटार | ६६.२२६३ | ५२.९८१० | ६.६२२६ | ६.६२२७ | १३.२४५२ | दुसरा |

**शासन निर्णय—**

खालील तक्यात दर्शविल्याप्रमाणे “सात शहरांच्या निकटच्या शहरांच्या नागरी पायाभूत सुविधांचा विकास (UIDSST) ” या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत वसई-विरार शहर महानगरपालिकेस भुयारी गटार प्रकल्पासाठी केंद्र हिश्याच्या दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

रूपये कोटीत

| अनु क्र. | महानगरपालिकेचे नाव | योजनेचे स्वरूप | मंजूर किंमत | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय निधी | केंद्र शासनामार्फत वितरीत हप्त्याचा निधी | केंद्र शासनाने वितरीत करावयाच्या हप्त्याचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| १ | वसई-विरार | भुयारी गटार | ६६.२२६३ | ५२.९८१० | १३.२४५२ | दुसरा |

०२. सदर रकमेचे वितरण अनुदान म्हणून करण्यात येत आहे. त्यानुसार तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे रूपये तेरा कोटी, चोवीस लक्ष, बावन्न हजार (रूपये १३,२४,५२,०००/-) इतका निधी वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्यात आली असून यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व सहायक

संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सहायक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी सदर अनुदान रूपये तेरा कोटी, चोवीस लक्ष, बावन्न हजार (रूपये १३,२४,५२,०००/-) इतक्या रकमेचा धनादेश आयुक्त वसई-विरार शहर महानगरपालिका (Commissioner, Vasai-Virar City Municipal Corporation) या नावे काढून तो वसई-विरार महानगरपालिका यांच्याकडे सुपूर्द करावा व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

०३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्रिपक्षीय करारनाम्यात नमूद केलेल्या सुधारणांबाबत वर्षनिहाय केलेली प्रगती पाहून तसेच वितरित केलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र सादर करावे. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र वसई-विरार महानगरपालिकेडून प्राप्त करून घेऊन महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रण अधिकारी या नात्याने संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांची राहिल.

०४. केंद्र शासनाकडून प्रत्यक्ष पाहणीद्वारे या योजनेअंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या तसेच सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा आढावा घेण्यात येईल. सदर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दर ३ महिन्यांनी राज्यस्तरीय नोडल एजन्सीमार्फत राज्य तसेच केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचा अहवाल राज्य शासन तसेच केंद्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

०५. प्रस्तुत योजनेअंतर्गत सर्व प्रकल्पांची अंमलबजावणी पूर्ण झाल्यानंतर या योजनेमधून काय साध्य झाले याबाबतचा अहवाल सदर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी राज्य शासन व केंद्र शासनास सादर करावा.

०६. या नागरी स्थानिक स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यात येणाऱ्या अनुदान रूपये तेरा कोटी, चोवीस लक्ष, बावन्न हजार (रूपये १३,२४,५२,०००/-) इतक्या रकमेचा खर्च हा नगर विकास विभाग-मागणी क्रमांक एफ-२, २२१७, नगर विकास, केंद्र सहाय्यीत योजना (००) (४८) जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानाअंतर्गत महानगरपालिकांना सहायक अनुदान (२२१७१४०१), ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर), दत्तमत, १९१-महानगरपालिकांना सहाय्य या लेखाशीर्षामधून सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०७. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४८/व्यय-३ दिनांक २९/०१/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२३१२५८३३५२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema Pradeep Dhamdhere

Digitally signed by Seema Pradeep Dhamdhere
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Seema Pradeep Dhamdhere
Date: 2015.02.23 13:08:25 +05'30'

**( सीमा ढमढेरे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, नागपूर
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
६. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू.), मुंबई.
७. सहायक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. विशेष कार्य अधिकारी तथा नोडल एजन्सी फॉर जे.एन.एन.यु.आर.एम. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई
९. उपसचिव (नवि-०४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. आयुक्त, वसई-विरार महानगरपालिका, वसई
११. जिल्हाधिकारी, ठाणे
१२. निवडनस्ती (नवि-३३)